सोलापूर महानगरपालिकेच्या जकात परिशिष्ट
"ओ" मधील काही वस्तूंच्या जकात दरातील
फेरफारास मंजूरी देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**क्रमांक -सोमपा-१८०५/७२२/प्रक्र-१२१/०५/नवि-२१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २ सप्टेंबर,२००५

**पहा** :१) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र जा.क्र.नआ/वै/जकात/८/४/८७ दिनांक १२.५.०५
२) महानगरपालिका सभा ठराव क्र.४५२, दिनांक ११.२.०५
३) सर्वसाधारण सभा ठराव क्रमांक २८ दि.३०.४.२००५

**प्रस्तावना** : महानगरपालिका क्षेत्रांचा विकास साधण्यासाठी व या क्षेत्रामध्ये औद्योगिक गुंतवणूक घटकांना विशिष्ट प्रोत्साहनपर सवलती देण्यात येत असून महानगरपालिका क्षेत्रातील औद्योगिक क्षेत्रांना जकातीबाबत विशेष पॅकेज देण्याचे शासनाचे धोरण आहे. सोलापूर महानगरपालिकेने ठराव क्रमांक २८, दिनांक ३०.४.२००५ अन्वये परदेशी यंत्रसामग्री व औद्योगिक कच्चा माल तसेच भारतीय बनावटीची सर्व औषधे व जीवरक्षक औषधे व उपकरणे यांना जकात दरात सवलत देण्याची बाब मान्य केली असून तसा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी पाठविला होता. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय** : सोलापूर महानगरपालिकेने परदेशी यंत्रसामग्री व औद्योगिक कच्चा माल तसेच भारतीय बनावटीची औषधे व जीवरक्षक औषधे व उपकरणे यांना सध्या आकारण्यात येणा-या जकात दराऐवजी सवलतीच्या दराने जकात आकारणी करण्याबाबतचा ठराव क्रमांक २८, दिनांक ३०.४.२००५ रोजी पारीत केला आहे. सदर ठरावास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम ,१९४९ च्या कलम १४९ (२) आणि ४५५ (२) अन्वये प्रदान केलेल्या शक्तीच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. जकात नियमावलीच्या परिशिष्ट "ओ" मधील आयटेम क्रमांक १०१ व ४१ मधील बदलाचे विवरणपत्र सोबत जोडले आहे.

०३. महानगरपालिकेने सदर जकात नियमावलीच्या परिशिष्ट "ओ" मधील बदल इंग्रजी व मराठी भाषेतील राजपत्रात त्वरीत प्रसिध्द करावेत.

०४. तसेच सर्व सांविधानिक बाबींचा सोलापूर महानगरपालिकेने पूर्तता करून शासनास अनुपालन अहवाल सादर करावा.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

(स्वाक्षरी)

**( फ.ब.खान )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१)आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर ( २ प्रती )

२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव

३) मा.प्रधान सचिव-२ (नवि) यांचे स्वीय सहाय्यक

४) निवडनस्ती ,नवि-२५ ( २ प्रती )

## विवरणपत्र-२

**शासन निर्णय , नगर विकास विभाग क्रमांक-सोमपा-२८०५/७२२/प्रक्र-१२५/०५/नवि-२५ दिनांक २ सप्टेंबर, २००५ अन्वये सुधारित केलेल्या जकात दराचे विवरणपत्र**

| अ.क्र. | जकात परिशिष्ट "ओ"मधील आयटेम क्रमांक | मालाचे वर्णन | जकात दर |
|---|---|---|---|
| १ | १०१ | परदेशी वस्तू (परदेशी यंत्रसामुग्री औद्योगिक कच्चा माल, जीवरक्षक औषधे व उपकरणे वगळून) | १० % |
| | १०१ अ | सर्व प्रकारची परदेशी यंत्र सामग्री व औद्योगिक कच्चा माल | ४ % |
| २ | ४१ | डिसइन्फेकटर्स, डेंटल गुड्स, टूथ पावडर,मेडिकेटेड वाईन, सोडा ॲश,सल्फेट ऑफ सोडा,धुण्याचा सोडा,ब्लिचिंग पावडर,डूब रंग (सूत अगर कापड रंगविण्यास) ॲनिलिन,ॲलिझॉर्न इन्डोथिन , वगैरे सिलेंडर गॅस, रंग,केमिकल फर्टीलायझर्स गंधक | ३ % |
| | | टूथपेस्ट | ३.२० % |
| | ४१ (अ) | सर्व प्रकारचे द्रवरंग , प्लॅस्टर ऑफ पॅरिस | ३.२० % |
| | ४१(ब) | भारतीय बनावटीची औषधे, जीवरक्षक औषधे व उपकरणे | २ % |